राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा-२०१६ या अंतर्गत अनुदानाचे वाटप.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : रागांअ-१११७/प्र.क्र.१४/१८अ**
हुतात्मा राजगुरू चौक,मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, (विस्तार) मुंबई-४०००३२
दिनांक: २९ मार्च, २०१७

वाचा : १) शासन निर्णय क्रमांक : सा.प्र.वि., प्रसुधा-१००२/प्र.क्र.७६/२००२/१८-अ,दि. ०२.०८.२००२.
२) शासन पत्र क्रमांक : सा.प्र.वि., रागांअ-१११५/प्र.क्र.३०/१५/१८-अ, दि. १३.०७.२०१५.
३) विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे विभाग यांचे पत्र क्र.साप्र३/आरआर/२१२/२०१७ दि. २४.०३.२०१७.

**प्रस्तावना :** -

संदर्भाधीन शासन निर्णय दि. ०२ ऑगस्ट, २००२ नुसार राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा, दरवर्षी दि. २० ऑगस्ट ते दि. ०२ ऑक्टोबर या कालावधीत राबविण्यात येतात. त्यानुसार सन २०१६ मध्ये सदर अभियान व स्पर्धा राबविण्यात आली. त्यानुसार संदर्भाधीन क्र. ३ येथील विभागीय आयुक्त,पुणे यांच्या कार्यालयाने अभियान व स्पर्धा राबवून त्याप्रमाणे अभियान व स्पर्धा अंतर्गत त्या त्या स्तरावर निवड झालेल्या विजेत्या कार्यालयाने पारितोषिक वितरणासाठी अनुदानाची मागणी केली आहे.

**शासन निर्णय :-**

राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा- २०१६ अंतर्गत संबंधित विजेत्या स्पर्धक कार्यालयांना पारितोषिक वितरणासाठी चालू आर्थिक वर्षी होणारा खर्च भागविण्यासाठी पुढील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे विभागीय आयुक्त, पुणे यांना अनुदानाचे वाटप करण्यात येत आहे. सदर रक्कम कोषागारातून काढण्यासाठी संबंधित विभागीय आयुक्त यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | रुपये |
|---|---|---|
| १ | विभागीय आयुक्त, पुणे | १,७०,०००/- |
| | एकूण | १,७०,०००/- |

रु. १,७०,००० (रुपये एक लाख सत्तर हजार फक्त) इतका खर्च मागणी क्र.ए-४, प्रधानशीर्ष - “२०५२, सचिवालय- सर्वसाधारण सेवा-०९० सचिवालय (००) (०१)” सामान्य प्रशासन विभाग, दत्तमत (२०५२ ००२५)-०५-बक्षिसे ” हया वित्तीय वर्षी करण्यात आलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

संबंधित विभागीय आयुक्त, पुणे यांनी तालुकास्तर, जिल्हास्तर तसेच विभागीयस्तर या स्तरावर निवडलेल्या प्रथम व द्वितीय क्रमांकाच्या स्पर्धकांना पारितोषिकाची रक्कम अदा करताना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. प्रसुधा-१००२/प्र.क्र.७६/२००२/१८-अ, दि. ०२ ऑगस्ट २००२ मधील आदेशांचे काटेकोरपणे पालन करावे.

महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिकेमधील नियम पुस्तिकेमधील नमुना क्रमांक १० मध्ये खर्चाचा तपशील ठेवण्यात यावा. तसेच खर्चाची माहिती (प्रमाणक क्रमांक व दिनांक, आहरण व संवितरण अधिकारी यांचे नांव कोषागार कार्यालयाचे नाव इ. व साक्षांकित देयकांच्या प्रतींसह) व उपयोगिता प्रमाणपत्र धनादेश मिळाल्यापासून एक महिन्याच्या आत अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन २६ व कार्यासन १८-अ, मंत्रालय मुंबई-३२ यांना सादर करण्याबाबत दक्षता घ्यावी. यासंबंधातील त्याबाबतची संपूर्ण जबाबदारी संबंधित कार्यालय प्रमुखाची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२९१४५९१२८२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, cn=Santosh Vithal Rokade
Date: 2017.03.29 15:01:50 +05'30'

**(संतोष रोकडे)**
अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग

**प्रत,**

१) विभागीय आयुक्त, पुणे
२) अधिदान व लेखा अधिकारी (२ प्रती-रोख शाखेमार्फत)
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) / (लेखा परीक्षा )- महाराष्ट्र-१, मुंबई (प्रत्येकी २ प्रती)
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) / (लेखा परीक्षा)- महाराष्ट्र-२, नागपूर (प्रत्येकी २ प्रती)
५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
७) उप कोषागार अधिकारी, पुणे
८) वित्त विभाग / व्यय-४
९) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग / का.क्र. २५ व २६, मंत्रालय, मुंबई
१०) निवड नस्ती, का.१८ सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई